<u>आमदार स्थानिक विकास कार्यक्रम</u>
**सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी लेखाशीर्ष ४५१५ ००१२ अंतर्गत मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीचे विधानमंडळ सदस्यनिहाय निधी वितरण.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- स्थाविका-०४२१/प्र.क्र. ४५ /का-१४८२,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- १२ नोव्हेंबर, २०२१

**वाचा:-** १) नियोजन विभाग, शासन निर्णय, क्र. स्थाविका-०६१६/प्र.क्र.९६/का.१४८२, दि. १२.७.२०१६
२) नियोजन विभाग, शासन निर्णय, क्र. स्थाविका-०४२१/प्र.क्र.४५/का.१४८२, दिनांक २३.४.२०२१, ५ मे, २०२१, ८.७.२०२१, २७.१०.२०२१ आणि २९.१०.२०२१

**शासन निर्णय :-**

"महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०२१" मंजूर झाले असून ते महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या अधिसंमतीनुसार महाराष्ट्र अधिनियम क्र. ५ म्हणून, महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४, दिनांक १५ मार्च, २०२१ यामध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे. आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षाकरिता रु. ११०१.०० कोटी एवढी अर्थसुंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे. आता वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र. ४८/अर्थ-३, दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१ अन्वये आमदार स्थानिक विकास कार्यक्रमा अंतर्गत १०० % निधी वितरीत करण्यास वित्त विभागाने मंजूरी दिलेली आहे. त्यानुसार २७९ विधानसभा सदस्य तसेच ९ विधानसभा सदस्यांना प्रति सदस्य अनुक्रमे रु. ३.०० कोटी व रु. १.५० कोटी याप्रमाणे रु. ८४९.०० कोटी व ६६ विधान परिषद सदस्यांना त्यांचा सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील कार्यकालानुसार अनुज्ञेय असलेला रु. १८७.५० कोटी असा एकूण रु. १०३६.५० कोटी (रु. एक हजार छत्तीस कोटी पन्नास लक्ष फक्त) एवढा निधी यापूर्वीच संदर्भाधीन क्र. २ येथील शासन निर्णयांन्वये वितरीत करण्यात आला आहे. आता नांदेड जिल्हयातील आचारसंहिता संपुष्टात आल्याने या जिल्हयातील ८ विधानसभा सदस्य व २ विधान परिषद सदस्य यांना प्रत्येकी रु. १.५० कोटी तसेच देगलूर विधानसभा क्षेत्राचे नवनिर्वाचित विधानसभा सदस्यांना त्यांचा सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील ५ महिन्यांचा कार्यकालासाठी अनुज्ञेय निधी ( नोव्हेंबर २०२१ ते मार्च, २०२१) रु. १.२५ कोटी याप्रमाणे एकूण रु. १६.२५ कोटी एवढा निधी ( रु. सोळा कोटी पंचवीस लक्ष फक्त) एवढा निधी सोबतच्या तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे वितरीत करण्यात येत असून सदर निधी जिल्हाधिकारी, नांदेड यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे.

२. जिल्हाधिकारी यांनी नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. स्थाविका-०६१६/ प्र.क्र.९६/ का.१४८२, दिनांक १२ जुलै, २०१६ च्या तरतुदींच्या अधीन राहून या निधीचे पुढील वितरण तात्काळ करावे. या निधीमधून आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत वेळोवळी अनुज्ञेय करण्यात आलेल्या बाबींवरील खर्च खालील लेखाशीर्षांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षामध्ये उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा.

मागणी क्र. ओ-१०
४५१५- इतर ग्राम विकास कार्यक्रमावरील भांडवली खर्च,
(००) १०२ सामुहिक विकास
(०१) (००) (०१) आमदार स्थानिक विकास कार्यक्रम (४५१५००१२)
(योजनांतर्गत) (दत्तमत)
५३- मोठी बांधकामे

३. वित्त विभागाच्या क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. २ अन्वये हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर हा शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१११११५१७१९०८५४१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Digitally signed by Sanjeev Harishchandra Dhuri
Date: 2021.11.15 17:25:18 +05'30'

**( सं. ह. धुरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१ मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन, रा.उ.शु) यांचे खाजगी सचिव,
२ मा.राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव
३ महालेखापाल (लेखापरीक्षा)/ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई
४ जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती (सर्व)
५ उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांचे कार्यालय, (सर्व)
६ जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती (सर्व)
७ जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
९ वित्त विभाग (कार्यासन अर्थ-१६/व्यय-८),
९ नियोजन विभाग, अर्थसंकल्प कक्ष (का.१४२४),
१० ग्रंथपाल व संदर्भ अधिकारी, नियोजन विभाग.

| शासन निर्णय क्र. स्थाविका-०४२१/प्र.क्र.४५/का.१४८२, दिनांक १२ नोव्हेंबर, २०२१ चे सहपत्र (रु. हजारांत) | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| जिल्हा | अ.क्र | वि.स.स. चे नाव | मतदारसंघ | वितरित निधी | | अ. क्र | वि.प.स. चे नाव | कार्यकाल समाप्तीचा दिनांक | वितरित निधी | एकूण वि.स.स. + वि.प.स. |
| १ | २ | ३ | ४ | ५ | | ७ | ८ | ९ | १० | ११ |
| **नांदेड** | १ | श्री.बालाजी देविदासराव कल्याणकर | नांदेड (उत्तर) | १५००० | | १ | श्री.अमरनाथ अनंतराव राजूरकर | ५.१२.२०२२ | १५००० | ३०००० |
| | २ | श्री. मोहनराव मारोतराव हंबर्डे | नांदेड (दक्षिण) | १५००० | | २ | श्री. रामराव बालाजीराव पाटील | २७.०७.२०२४ | १५००० | ३०००० |
| | ३ | श्री.श्यामसुंदर दगडुजी शिंदे | लोहा | १५००० | | | | | | १५००० |
| | ४ | श्री.तुषार गोविंदराव राठोड | मुखेड | १५००० | | | | | | १५००० |
| | ५ | श्री.राजेश संभाजी पवार | नायगांव | १५००० | | | | | | १५००० |
| | ६ | श्री. अशोक शंकरराव चव्हाण | भोकर | १५००० | | | | | | १५००० |
| | ७ | श्री.माधवराव निवृत्तीराव जवळगावकर-पाटील | हदगांव | १५००० | | | | | | १५००० |
| | ८ | श्री. भिमराव रामजी केराम | किनवट | १५००० | | | | | | १५००० |
| | ९ | श्री. जितेश रावसाहेब अंतापूरकर | देगलूर | १२५०० | | | | | | १२५०० |
| | | **वि.स.स एकूण (८)** | **नांदेड** | **१३२५००** | | | **वि.प.स एकूण (२)** | **नांदेड** | **३००००** | **१६२५००** |

Digitally signed by Sanjeev Harishchandra Dhuri
Date: 2021.11.15 17:25:33 +05'30'

( सं. ह. धुरी )
उप सचिव, महाराष्ट्र शासन